**टॅक्सी व ऑटोरिक्षांचे भाडेदर सूत्र विहित करण्याबाबत समितीची स्थापना.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एमव्हीआर ०५१५/प्र.क्र.२४४/परि-२**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- ०२ जून, २०१५.

**वाचा :** १) शा.नि.क्र.एमव्हीआर-१११/प्र.क्र.९६६/परि-२, दिनांक १३.४.२०१२.
२) शा.नि.क्र.एमव्हीआर-०७१२/प्र.क्र.४० (१)/परि-२, दिनांक २८.९.२०१२.

**शासन निर्णय :**

राज्यातील ऑटोरिक्षा/टॅक्सींचे भाडेदर सूत्र विहित करण्याकरिता केंद्र शासनाचे सेवानिवृत्त सचिव श्री. पी.एम.ए.हकीम यांच्या अध्यक्षतेखाली संदर्भाधीन क्रमांक १ दिनांक १३.४.२०१२ च्या शासन निर्णयान्वये एक सदस्यीय समितीचे गठन करण्यात आले होते. सदर समितीने ऑटोरिक्षाचे भाडेदर सूत्र विहित करण्याबाबत सादर केलेल्या अहवालातील शिफारशींबाबत शासनाने घेतलेले निर्णय दिनांक २८.९.२०१२ च्या शासन निर्णयान्वये निर्णय घेतलेला आहे. सदर शासन निर्णयान्वये मागील ३ वर्षामध्ये निश्चित करण्यात आलेले भाडेदर आणि प्रत्यक्षातील भाववाढ याचा तुलनात्मक विचार करुन हकीम समितीच्या अहवालातील शिफारशींवर पुनर्विचार करुन बदललेल्या परिस्थितीनुरुप शासनास सुधारित शिफारशी करण्याकरिता मा. उच्च न्यायालयाचे माजी न्यायमुर्ती यांच्या अध्यक्षतेखाली त्रिसदस्यीय समिती स्थापन करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे. सदर समितीमध्ये वित्तीय बाबींशी संबंधित एक प्रतिनिधी तसेच परिवहन क्षेत्राशी संबंधित तज्ञ व्यक्ती म्हणून सेवानिवृत्त परिवहन आयुक्त किंवा अतिरिक्त परिवहन आयुक्त यांची सदस्य म्हणून नियुक्ती करण्यात येईल.

२. सदर त्रिसदस्यीय समितीने सर्व बाबींचा विचार करुन शासनास समिती स्थापनेच्या दिनांकापासून ६ महिन्याच्या आत सर्वसमावेशक शिफारशींसह अहवाल सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६०८१४२३३५९५२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

M B Tashildar

Digitally signed by M B Tashildar
DN: CN = M B Tashildar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Section Officer
Date: 2015.06.08 14:27:22 +05'30'

**( मो. बा. ताशिलदार )**
कार्यासन अधिकारी, गृह (परिवहन) विभाग

**प्रत :**

१) मा. मंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव
२) मा. राज्यमंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव
३) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन यांचे वरिष्ठ स्वीय सहायक
४) अपर मुख्य सचिव (गृह), यांचे वरिष्ठ स्वीय सहायक
५) अपर मुख्य सचिव (परिवहन) यांचे स्वीय सहायक
६) परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
७) निवडनस्ती.